**स्व. खाशाबा जाधव चषक राज्यस्तर कुस्ती स्पर्धा आयोजनासाठी निधी वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : क्रीस्पर्धा-३२२२/प्र.क्र.१८२/क्रीयुसे-२,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २० फ़ेब्रुवारी, २०२३.

वाचा :-

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.क्रीस्पर्धा २०१२/(प्र. क्र.२२९/१२)/क्रीयुसे-२, दि. ०३ नोव्हेंबर, २०१२.
२. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा यांचे क्र. क्रीयुसे/क.कु.व्हॉ.खो. स्प./आयोजन/२०२२-२३/का-४/६०२९ दि.१९.१२.२०२२

**प्रस्तावना :-**

राज्याचे क्रीडा धोरण, २०१२ मधील मुद्दा क्र. ५.४ नुसार शासन निर्णय दि.०३.११.२०१२ अन्वये खेळाडूंना सकस आहार, निवास व्यवस्था, प्रेक्षक गॅलरी, प्रवास खर्च, पारितोषीके, आयोजनावरील खर्च पाहता छत्रपती शिवाजी महाराज चषक कबड्डी स्पर्धेसाठी रु.५०.०० लक्ष अनुदान मंजूर करण्यात आले आहे.सदर क्रीडा धोरण हे नियोजन विभाग, वित्त विभागाच्या तसेच मंत्रीमंडळाच्या मान्यतेने निश्चित करण्यात आले आहे.

त्यानुसार स्व. खाशाबा जाधव चषक राज्यस्तर कुस्ती स्पर्धा आयोजनासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२२-२३ या वर्षामध्ये स्व. खाशाबा जाधव चषक राज्यस्तर कुस्ती स्पर्धेचे आयोजन करण्याकरीता रु. ५०.०० लक्ष (रुपये पन्नास लाख फ़क्त ) इतका निधी वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. या संदर्भात होणारा खर्च “मागणी क्र.ई-३, २२०४-क्रीडा व युवक सेवा- १०४ क्रीडा व खेळ (२६ ) कुस्ती स्पर्धा (२६) (०१) खाशाबा जाधव राष्ट्रीय कुस्ती स्पर्धा (२२०४- २०३७ ) ३१ सहायक अनुदाने वेतनेतर” या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ मधील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे, त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा.

II. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत

तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. शासनाच्या सूचनांनुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधीत उपसंचालक/जिल्हा क्रीडा अधिकारी /लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. अनौसं १४३/२०२३/व्यय-५, दि.०८.०२.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०२२०१८३२४३८९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ramdas Ganpat Dhumal

Digitally signed by Ramdas Ganpat Dhumal
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3246a8286e67ae7423b98bfd800865585eb8601521f097ab07142d65ea9b2b15, pseudonym=081ECC13959FDFAE420D6448809AEDBED849D4B4, serialNumber=24F4ACDDCFF993441F6C634862546E9D122E0DB556806B179B794879ACF360F5, cn=Ramdas Ganpat Dhumal
Date: 2023.02.20 18:38:36 +05'30'

**( रामदास धुमाळ )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
३. मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
४. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन , मुंबई
५. मा. सभापती / उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन , मुंबई
६.मा.मंत्री, क्रीडा व युवक कल्याण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७.मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
८. मा. राज्यमंत्री, क्रीडा व युवक कल्याण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
१ प्रधान. सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
११ .आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१२ .महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
१३ .महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
१४ .अधिदान व लेखाधिकारी, मुंबई(क्रीडा संचालनालयामार्फत) .
१५ .सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत )
१६ .वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे(क्रीडा संचालनालयामार्फत) .

१७ .लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे, (क्रीडा संचालनालयामार्फत )
१८ .सर्व उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत),
१९ .वित्त विभाग  व्यय ५- /अर्थ -८,नियोजन विभाग (का. १४७१ ) मंत्रालय मुंबई,
२० .कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२१. निवड नस्ती (क्रीयुसे-२).